आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात खास शिक्षण व मार्गदशान केंद्राची स्थापना (राज्य योजना) या योजनेसाठी निधी वितरण.
**(लेखाशिर्ष २२३० ०७५५)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/ प्र.क्र.०२/ कार्यासन-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : १३ फेब्रुवारी, २०२५

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.७.२०२४.
२) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र.प्रशिक्षण २०२४/प्रक्र. ११२/कार्या-०९.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रम अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२३०-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य लेखाशीर्षाखाली खास शिक्षण व मार्गदर्शन केंद्राची स्थापना (राज्य योजना) अंतर्गत कडीकसा, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, देवरी, जि. गोंदिया व रुपापेठ, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, चंद्रपूर येथील व्यवसाय प्रशिक्षण केंद्रामधील कर्मचाऱ्यांचे प्रलंबित मानधन देण्याबाबत प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आलेला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रम अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२३०-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य लेखाशीर्षाखाली आश्रमशाळा संलग्न व्यवसाय प्रशिक्षण केंद्र कडीकसा, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, देवरी, जि. गोंदिया येथील कर्मचाऱ्यांचे सन २०२२-२३, सन २०२३-२४ व सन २०२४-२५ मधील रु. १८.९० लाख इतके मानधन व शासकीय आश्रमशाळा संलग्न व्यवसाय प्रशिक्षण केंद्र,रुपापेठ, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, चंद्रपूर येथील कर्मचाऱ्यांचे सन २०२४-२५ मधील रु. ७.७४ लाख इतके मानधन असे एकूण रु. २६.६४ लाख इतका निधी लेखाशिर्ष २२३० ०७५५, ५०-इतर खर्च या खाली खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु. लाखात)**

| **योजना** | **लेखाशीर्ष** | **बाब** | **सन २०२४-२५ या वर्षातील अर्थसंकल्पित तरतूद** | **सदर शा. नि. अन्वये वितरीत येत असलेली तरतूद** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| खास शिक्षण व मार्गदर्शन केंद्राची स्थापना ( राज्य योजना) | २२३० ०७५५ | ५०, इतर खर्च | १०००.०० | २६.६४ |

२. उपरोक्त प्रमाणे एकूण **रु.२६.६४ लाख (अक्षरी रुपये सव्वीस लाख चौसष्ट हजार फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक** यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत व खर्च करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. ज्या प्रयोजनासाठी निधीची मागणी केली आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची जबाबदारी सबंधित नियंत्रक अधिकारी यांची राहील.

४. सदर प्रकरणी विहीत कार्यपध्दतीचा अवलंब केल्याची खातरजमा करुनच सदरचा खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.

५. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी सदर वितरीत निधी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, देवरी जि. गोंदिया व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, चंद्रपूर यांना तात्काळ उपलब्ध करुन द्यावा.

६. वितरीत निधीचा विनियोग संदर्भाधीन क्र.१ येथील शासन पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसारच करण्यात यावा. तसेच सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका मध्ये दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या ई ऑफिस नोट क्र. ११, दि. ६.२.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१३१२२६१२५४२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA
DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2025.02.13 12:27:14 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर.
६. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, देवरी, जि. गोंदिया
७. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, चंद्रपूर, जि. चंद्रपूर.
८. सर्व लेखा व कोषागार अधिकारी.
९. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
१०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
११. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१२. कार्यासन क्र. ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.